शेतकरी मासिक योजनेंतर्गत माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४ व क्षेत्रीय स्तरावरून जिल्ह्यांच्या मागणीनुसार सेंद्रिय शेती विशेषांकाच्या ज्यादा छपाईची देयके अदा करण्यासाठी रु.२७.३८ लक्ष निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०२३/प्र.क्र.११०/३-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा -**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेमाछ-२०१६/प्र.क्र.२९०/११-अे, दि.२३.०३.२०१७
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेमाछ-२०२१/प्र.क्र.१११/३-अे, दि.१७.०१.२०२३
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेमाछ-२०२१/प्र.क्र.१११/३-अे, दि.२४.०३.२०२३
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेमाछ-२०२१/प्र.क्र.१११/३-अे, दि.३१.०३.२०२३
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/३-अे, दि.२०.०७.२०२३
६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/३-अे, दि.२४.११.२०२३
७) वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३
८) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२०७/३-अे, दि.१०.०१.२०२४
९) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/३-अे, दि.१६.०१.२०२४
१०) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२०७/३-अे, दि.२३.०१.२०२४
११) संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र. शेमासे/शे.अंकछ./नि.मा.शा.प्र./३२/२०२४, दि.२०.०२.२०२४

**प्रस्तावना -**

शेतकऱ्यांच्या हितार्थ सन १९६५ पासून प्रकाशित करण्यात येणाऱ्या शेतकरी मासिकाच्या माध्यमातून कृषि क्षेत्रातील लक्षवेधक तसेच अद्ययावत घडामोडींची माहिती राज्यातील व राज्याबाहेरील शेतकऱ्यांना पोहचविण्यात येते. कृषि विभागाच्या संदर्भाधीन दि. १० जानेवारी, २०२३ व दि. २३.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये सन २०२४-२६ करिता फेब्रुवारी, २०२४ ते जानेवारी, २०२६ या कालावधीतील शेतकरी अंक छपाईचे काम आनंद पब्लिकेशन, जळगाव यांच्याकडे सोपविण्यात आले आहे.

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात २४०१ - पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, १०९ (०१) (०२) शेतकरी मासिक, (२४०१ ०७४४) या लेखाशिर्षाखाली (२६) जाहिरात व प्रसिद्धी या बाबीवर रु.२४८.८३ लक्ष इतक्या निधीची तरतुद करण्यात आली आहे. या विभागाच्या दि.२०.०७.२०२३, दि.२४.११.२०२३ व दि.१६.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयानुसार, फेब्रुवारी, २०२३ ते ऑक्टोंबर, २०२३ या महिन्यांतील शेतकरी मासिक अंक छपाईच्या देयकांकरीता जाहिरात व प्रसिद्धी या बाबीवर होणा-या खर्चासाठी अनुक्रमे रू.६२.५७ लक्ष, रू. २.१२५८० लक्ष व ७९.९६ लक्ष अशी एकूण रु. १४४.६५५८० लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात

आला आहे. सुधारीत अंदाज २०२३-२४ नुसार रू.१७४.१८ लक्ष निधी उपलब्ध असून त्यातून रु. १४६.८०९७० लक्ष निधी वितरीत करण्यात आला असुन शिल्लक निधी रु.२७.३८ लक्ष आहे.

संदर्भाधीन दि.२०.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४ व क्षेत्रीय स्तरावरून जिल्ह्यांच्या मागणीनुसार सेंद्रिय शेती विशेषांकाच्या ज्यादा छपाईची देयके अदा करण्यासाठी रु. ६५.८०३५ लाख (अक्षरी रु. पासष्ठ लाख ऐंशी हजार तीनशे पन्नास) निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

त्यानुसार माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४ व क्षेत्रीय स्तरावरून जिल्ह्यांच्या मागणीनुसार सेंद्रिय शेती विशेषांकाच्या ज्यादा शेतकरी मासिक अंक छपाईची देयके अदा करण्यासाठी रु.२७.३८ लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णय -**

१) माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४ व क्षेत्रीय स्तरावरून जिल्ह्यांच्या मागणीनुसार सेंद्रिय शेती विशेषांकाच्या ज्यादा शेतकरी मासिक अंक छपाईची देयके अदा करण्यासाठी रु.२७.३८ लक्ष (रु. सत्तावीस लक्ष अडतीस हजार फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२) यावरील खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, १०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार (०१) (०२) शेतकरी मासिक, (२४०१ ०७४४) या योजनेत्तर लेखाशिर्षाखाली (२६) जाहिरात व प्रसिद्धी या बाबीवरील सन २०२३-२४ करिता मंजूर केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३) सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

४) हा आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौसं-९०/२०२४/व्यय-१, दि.१२.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१३३४०३३२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.15 14:02:12 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अमुस (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. कृषि संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. कृषि उपसंचालक तथा संपादक, शेतकरी मासिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा ), मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा ), नागपूर
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
१३.संचालक, शासन लेखन,मुद्रण सामग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई ४
१४.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे
१५.वित्त विभाग (व्यय-१/विनियम/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
१६.आनंद पब्लिकेशन, जळगाव
१७.कक्ष अधिकारी-२ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१८. निवड नस्ती, कार्यासन ३-अे